महाराष्ट्र शासन

क्रमांकः क्र.अविवि-२०१२/प्र.क्र.२१९/का-७

अल्पसंख्याक विकास विभाग

मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-३२,

तारीख: ०३/०७/२०१५

**विषय** :-११ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र पुरस्कृत अल्पसंख्याक बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) परभणी येथील मुलींच्या वसतीगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

वाचा -

**१) अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ३/६६/२०१०-PP-१, दि. १२/१०/२०१०.**

**२) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. बियुडी-२०१०/प्र.क्र.४६/का-७, दि. ०८/०३/२०११.**

**३) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. बियुडी-२०१२/प्र.क्र.२२५/का-७, दि. १७/०८/२०१३.**

**ज्ञापन -**

११ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कामकाज मंत्रालयामार्फत राज्यातील परभणी, वाशिम, हिंगोली व बुलडाणा या अल्पसंख्याक बहुल जिल्हयात बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम (MsDP) राबविण्यात येत आहे. MsDP अंतर्गत गठीत शक्तीप्रदान समितीने दि. १७/०९/२०१० रोजी झालेल्या ३८ व्या बैठकीत परभणी येथे मुलींचे ०१ वसतीगृह बांधणे या योजनेकरिता एकूण रु.१५९.५४ लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र. (१) येथील दि.१२/१०/२०१० च्या पत्राव्दारे कळविले आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन परभणी येथील मुलींच्या वसतीगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास कार्योत्तर प्रशासकिय मान्यता देण्याची बाब प्रस्तावित आहे.

२. केंद्र शासनाने परभणी येथील मुलींच्या ०१ वसतीगृह इमारत बांधकामास दिलेल्या मान्यतेचा तपशील पुढीलप्रमाणे :-

| अ. क्र. | योजना | युनिटची संख्या | केंद्रशासनाच्या मान्यतेनुसार प्रती युनिट खर्च | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | मुलींच्या १०० प्रवेशक्षमतेचे वसतीगृह इमारत बांधकाम | ०१ | १५९.५४ | १३३.७४ | २५.८० | १५९.५४ |

३. सदर वसतीगृह इमारत बांधकामासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी यांनी तयार केलेले अंदाजपत्रक हे सन २०१०-११ च्या दरसूचीवर आधारित आहे. परभणी येथील मुलींच्या वसतीगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेचा तपशील थोडक्यात पुढीलप्रमाणे :-

| अ.क्र. | तपशील | रुपये |
|---|---|---|
| १ | मुख्य इमारत किमंत | १,३४,०६,३५२/- |
| २ | बोअरवेल आणि पंप हाऊस | ३,४२,१४०/- |
| ३ | रेन वॉटर हार्वेस्टिंग | १,७१,८९४/- |
| | एकूण (अ) | १,३९,२०,३८६/- |
| ४ | ९% विद्युतीकरण | १२,०६,५७२/- |
| ५ | ५% सेंटेज चार्जेस | ७,५६,२०५/- |
| ६ | आकस्मिकता चार्जेस | ७०,८३७/- |
| | एकूण (ब) | २०,३३,६१४/- |
| | **एकूण (अ)+(ब)** | **१,५९,५४,०००/-** |
| | **से (रु.)-** | **१,३९,२१,०००/-** |

४. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या MsDP अंतर्गत गठीत शक्तीप्रदान समितीने दि. १७/०९/२०१० रोजी झालेल्या ३८ व्या बैठकीत ₹१,५९,५४,०००/- इतक्या रकमेच्या परभणी येथील मुलींच्या वसतीगृह इमारत बांधकाम प्रस्तावास मान्यता प्रदान केली आहे. केंद्र शासनाच्या दिलेल्या मान्यतेस तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेस अनुसरुन ₹१,५९,५४,०००/-इतक्या रकमेच्या परभणी येथील मुलींच्या वसतीगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास याद्वारे कार्योत्तर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. ही मान्यता शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००)(१७) अल्पसंख्याक बहूल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) (२२३५ ए ५४३) ३१ - सहाय्यक अनुदान" तसेच "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत

योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२३५ ए २३१) ३१-सहाय्यक अनुदान” या उद्दिष्टाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात आला आहे.

७. सदर मुलींच्या वसतीगृह इमारतीचे बांधकाम सन २०१२-१३ ते सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पूर्ण करण्यात आले आहे.

८. संदर्भ क्र. ( २) व (३) येथील शासन निर्णयाद्वारे परभणी येथील मुलींच्या वसतीगृह इमारत बांधकामासाठी रक्कम वितरित करण्यात आली असून याबाबतच्या वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे :-

(रु. लाखात)

| आर्थिक वर्ष | खर्च | सुरु असलेल्या इतर कामासाठी आवश्यक तरतूद | एकूण मंजूर तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २०११-१२ | ६६.८७ | - | ६६.८७ |
| २०१२-१३ | | - | |
| २०१३-१४ | ६६.८७ | - | ६६.८७ |
| २०१४-१५ | | - | |
| एकूण | १३३.७४ | - | १३३.७४ |

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०७१७३३३०६११४ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.07.07 17:35:21 +05'30'

**( अशोक गायकवाड )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद,

२) जिल्हाधिकारी, परभणी,

३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद,

४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड,

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी,

६) सह संचालक, तंत्रशिक्षण/ व्यवसाय शिक्षण संचालनालय, मुंबई,

७) प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, परभणी,

८) आयुक्त, परभणी महानगरपालिका, परभणी.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी,

१०) सह सचिव/ उप सचिव/ सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) निवडनस्ती (का-७)